राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत पात्र शिधापत्रिकाधारकांना आगामी गुढीपाडवा, डॉ.बाबासाहेब आंबेडकर जयंती, इत्यादी सणानिमित्त "आनंदाचा शिधा" वितरण करण्याबाबतची कार्यपध्दती.

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक :- अधापु-२०२३/प्र.क्र.०९/नापु-२२.**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : १६ मार्च, २०२३.

वाचा :- १. शासन निर्णय क्र.अधापु-२०२३/प्र.क्र.०९/नापु-२२, दि. २२.०२.२०२३.
२. शासन निर्णय क्र.राभादु-१०१७/प्र.क्र.७०/नापु-३१, दि ०४.०९.२०१७.

परिपत्रक :-

विभागाच्या संदर्भाधीन क्र.१ येथील दि. २२.२.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अंत्योदय अन्न योजना, प्राधान्य कुटुंब तसेच औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व आणि नागपूर विभागातील वर्धा अशा १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील दारिद्र्य रेषेवरील (एपीएल) केशरी शेतकरी शिधापत्रिकाधारकांना आगामी गुढीपाडवा, डॉ. बाबासाहेब आंबेडकर जयंती, इत्यादी सणांनिमित्त प्रत्येकी १ किलो या परिमाणात रवा, चणाडाळ, साखर व १ लिटर या परिमाणात पामतेल हे शिधाजिन्नस समाविष्ट असलेला "आनंदाचा शिधा" गुढीपाडवा या मराठी नविन वर्षापासून पुढील १ महिन्याच्या कालावधीकरिता ई-पॉस प्रणालीद्वारे ₹ १००/- प्रतिसंच या सवलतीच्या दराने वितरीत करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

त्यानुषंगाने पात्र शिधापत्रिकाधारकांना शिधाजिन्नस संचांचे वितरण करण्याबाबत पुढीलप्रमाणे सूचना देण्यात येत आहेत :-

१. राज्यातील सार्वजनिक वितरण व्यवस्थेअंतर्गत अंत्योदय अन्न योजना, प्राधान्य कुटुंब तसेच औरंगाबाद व अमरावती विभागातील सर्व जिल्हे व नागपूर विभागातील वर्धा अशा १४ शेतकरी आत्महत्याग्रस्त जिल्ह्यातील एपीएल (केशरी) शेतकरी शिधापत्रिकाधारकांना १ किलो रवा, १ किलो चणाडाळ, १ किलो साखर व १ लिटर पामतेल या ४ शिधाजिन्नसांचा समावेश असलेला १ शिधाजिन्नस संच प्रति शिधापत्रिका ई-पॉस प्रणालीद्वारे प्रति संच ₹ १००/- या दराने वितरीत करावेत.

२. जिल्हानिहाय पुरवठा करावयाच्या शिधाजिन्नस संचांच्या संख्येचे विवरणपत्र सोबत जोडलेले आहे. सदर संख्येच्या मर्यादेत केंद्रिय भांडार, मुंबई यांनी शिधाजिन्नस संच संबंधित तालुका गोदामांपर्यंत पोहोचवावेत.

३. गोदामात येणारी शिधाजिन्नस आवक तसेच रास्त भाव दुकानात पाठवण्यात येणारे शिधाजिन्नस यांची नोंद online पद्धतीनेच ठेवणे आवश्यक आहे. त्यानुसार AePDS पोर्टलवर योग्य त्या नोंदी घेण्याची दक्षता घ्यावी.

४. शिधाजिन्नस संचात समाविष्ट शिधाजिन्नस FSSAI मानकाची पूर्तता करीत असल्याचे NABL अधिकृत प्रयोगशाळेचे प्रमाणपत्र कंत्राटदाराकडून प्राप्त करुन घेऊन तद्नंतरच शिधाजिन्नस संच स्विकारण्यात यावेत. कोणत्याही परिस्थितीत निकृष्ट दर्जाचे शिधाजिन्नस / शिधाजिन्नस संच स्वीकारले जाणार नाहीत, याची दक्षता घ्यावी.

५. कंत्राटदाराकडून तालुका गोदामात शिधाजिन्नस संच प्राप्त झाल्यावर, जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांनी स्वत: अथवा तहसिलदार यांच्यापेक्षा कमी दर्जा नसलेल्या अधिकाऱ्याची नेमणूक करून शिधाजिन्नस संचाची कंत्राटदाराच्या प्रतिनिधीसमोर यादृच्छिकपणे (randomly) नमुने गोळा करावेत. सदर नमुन्यांची NABL अधिकृत प्रयोगशाळेत तपासणी करावी. सदर तपासणीअंती नमुना विहित निकषांची पुर्तता करीत नसल्याचे आढळल्यास, पुरवठादारास तात्काळ अवगत करून संबंधित शिधाजिन्नस संचाचा साठा (Lot) बदलून घेण्याबाबत कार्यवाही करावी.

६. सदर शिधाजिन्नस संच प्रति संच ₹१००/- या दराने वितरीत करावयाचे आहेत. सदर विक्रीपोटी प्राप्त होणारी रक्कम रास्तभाव दुकानदारांनी मार्जिन वजा करुन उर्वरित रक्कम जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी / उप नियंत्रक यांच्याकडे शिधाजिन्नस संचांच्या वितरणानंतर तात्काळ जमा करावी. सदर शिधाजिन्नस संचांची विक्री करण्याकरिता संदर्भाधीन क्र.२ येथील दिनांक ४ सप्टेंबर, २०१७ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार रास्तभाव दुकानदारांना मार्जिन देय राहील.

७. जिल्हा पुरवठा अधिकारी / अन्नधान्य वितरण अधिकारी/ उप नियंत्रक यांनी त्यांच्या जिल्ह्याकरिता प्राप्त व वितरीत होणाऱ्या शिधाजिन्नस संचांची माहिती शासनास वेळोवेळी उपलब्ध करुन द्यावी व त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

८. प्रस्तुत शिधाजिन्नस संचांच्या खरेदीसाठी केंद्रिय भांडार, मुंबई यांच्याशी करारनामा करण्याबाबत वित्तीय सल्लागार व उपसचिव यांनी कार्यवाही करावी.

९. केंद्रिय भांडार, मुंबई यांनी शासनास पुढील मुद्याबाबतची माहिती दररोज napu२२.mhpds@mah.gov.in या ई-मेल वर तसेच वित्तीय सल्लागार व उपसचिव यांना सादर करावी :-

अ) शासनाने विहीत केलेल्या ठिकाणी (ठिकाणांच्या नावांसह) पोहोच केलेले शिधाजिन्नस संच.

ब) निविदाधारकाकडे / केंद्रिय भांडार, मुंबई यांच्याकडे शिल्लक राहिलेले शिधाजिन्नस संच.

१०. उपरोक्त कार्यपद्धतीनुसार सर्व संबंधितांनी कार्यवाही करावी. सदर कार्यवाहीमध्ये कोणत्याही प्रकारे कसूर झाल्यास संबंधितांना जबाबदार धरण्यात येईल, याची सर्व संबंधितांनी नोंद घ्यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०३१६१७२८४०३३०६ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

POOJA PRASAD MANKAR

Digitally signed by POOJA PRASAD MANKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=FOOD CIVIL SUPPLY AND CONSUMER PROTECTION DEPARTMENT, 2.5.4.20=2587c101141ff0822d1f39f866ca3537dfc0e52728f898604a75ff77b46e7415, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=3063036B7F64E995ED6A8BC7C9FBB1A5A10E6562F73D65107AD668D006B3B164, cn=POOJA PRASAD MANKAR
Date: 2023.03.16 17:36:27 +05'30'

**( पूजा मानकर )**
शासनाच्या अवर सचिव

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
४. मा. मंत्री, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई

६. मा. विरोधी पक्षनेता, विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई
७. सर्व विधान परिषद सदस्य व विधानसभा सदस्य.
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१२. नियंत्रक, शिधावाटप व संचालक, नागरी पुरवठा, मुंबई.
१३. वित्तीय सल्लागार व उप सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई
१४. सर्व उपायुक्त (पुरवठा)
१५. सर्व जिल्हा पुरवठा अधिकारी
१६. सर्व अन्नधान्य वितरण अधिकारी
१७. सर्व अधिकारी (सचिव वगळून) ,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१८. सर्व कार्यासने, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
१९. सर्व खाजगी सचिव, मा. मंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२०. सर्व खाजगी सचिव मा. राज्यमंत्री कार्यालये, मंत्रालय, मुंबई.
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
२२. महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय, ६ वा मजला, विधानभवन, मुंबई
२३. महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र- १, मुंबई
२४ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१ मुंबई
२५. महालेखापाल लेखा परिक्षा महाराष्ट्र-२, मुंबई
२६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, मुंबई
२७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर
२८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, नागरी पुरवठा, लेखा परिक्षा मंडळ द्वारा वित्तीय सल्लागार व उपसचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
२९. वित्त विभाग, व्यय-१०, मंत्रालय, मुंबई
३०. सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग यांचे स्वीय सहायक
३१. सर्व उपसचिव/अवर सचिव/ कार्यासन अधिकारी, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभागमंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३२. केंद्रिय भांडार , न्यु शॉपिंग सेंटर,इमारत क्र. ३३ जवळ,सी जी एस क्वार्टर्स, सेक्टर ७ ,अँटॉप हिल, मुंबई - ४०००३७.
३३. निवडनस्ती नापू-२२.

| अ.क्र. | जिल्हा | पुरवठा करावयाच्या शिधाजिन्नस संचांची संख्या |
|---|---|---|
| 1 | 2 | 3 |
| 1 | A Region Parel | 129922 |
| | D Region Andheri | 177818 |
| | E Region Wadala | 435238 |
| | F Region Thane | 649975 |
| | G Region Kandivali | 217000 |
| | MTRA | 1609953 |
| 2 | Thane | 154448 |
| 3 | Palghar | 390830 |
| 4 | Raigad | 431042 |
| 5 | Ratnagiri | 258482 |
| 6 | Sindhudurg | 158749 |
| 7 | Nashik | 782562 |
| 8 | Dhule | 298835 |
| 9 | Jalgaon | 616177 |
| 10 | Nandurbar | 266322 |
| 11 | Ahmadnagar | 684301 |
| 12 | Pune DSO | 561592 |
| 13 | Pune FDO | 317881 |
| 14 | Solapur DSO | 370421 |
| 15 | Solapur FDO | 114703 |
| 16 | Kolhapur | 486806 |
| 17 | Sangli | 398946 |
| 18 | Satara | 381531 |
| 19 | Aurangabad | 554966 |
| 20 | Jalna | 345662 |
| 21 | Nanded | 593105 |
| 22 | Beed | 508712 |
| 23 | Osmanabad | 297620 |
| 24 | Parbhani | 288396 |
| 25 | Latur | 410548 |
| 26 | Hingoli | 218799 |
| 27 | Amravati | 555643 |
| 28 | Washim | 252086 |
| 29 | Akola | 331357 |
| 30 | Buldana | 483622 |
| 31 | Yavatmal | 558831 |
| 32 | Nagpur DSO | 413864 |
| 33 | Nagpur FDO | 388072 |
| 34 | Wardha | 282397 |
| 35 | Bhandara | 228781 |
| 36 | Gondia | 232818 |
| 37 | Chandrapur | 405282 |
| 38 | Gadchiroli | 212041 |
| **Total** | | **15846182** |